नगर रचनाकार (पदवीधारक) (गट-अ/ राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांना सहायक संचालक, नगर रचना (पदवीधारक) (गट-अ/ राजपत्रित) पदावर निव्वळ तात्पुरत्या पदोन्नतीने पदस्थापना देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन आदेश क्रमांक : बिंदूना-६२२२/प्र.क्र.१८९/नवि-२७,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
चौथा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३१ मे, २०२३.

वाचा :- १) सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना क्र.एसआरव्ही-२०२०/प्र.क्र.४९/कार्या-१२, दि.१४.०७.२०२१.
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/का.१२, दि.१२.०९.२०१६.

**प्रस्तावना :-**

नगर विकास विभागाच्या आस्थापनेवरील **सहायक संचालक, नगर रचना (पदवीधारक)** (गट-अ /राजपत्रित) **(वेतनश्रेणी : एस-२३ : ६७,७००-२,०८,७००)** या संवर्गातील सन २०२२-२०२३ या निवडसूची वर्षातील (दि.०१.०९.२०२२ ते दि.३१.०८.२०२३) पदवीधारक कोटयातील रिक्त पदे निम्न संवर्गातील नगर रचनाकार (पदवीधारक) या संवर्गातून पदोन्नतीने भरण्यासाठी विभागीय पदोन्नती समितीची बैठक दि.०४.०२.२०२३ रोजी अपर मुख्य सचिव (नवि-१) तथा अध्यक्ष यांच्या अध्यक्षतेखाली संपन्न झाली आहे. सदर बैठकीचे इतिवृत्त (निवडसूची) सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन १२ च्या मान्यतेस्तव सादर केले असता, सहायक संचालक, नगर रचना (पदवीधारक) संवर्गाच्या सन २०२२-२०२३ च्या निवडसूचीस सामान्य प्रशासन विभागाने मान्यता दिली आहे. सदर अधिकाऱ्यांना पदोन्नती व पदस्थापना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने आता पुढीलप्रमाणे आदेश देण्यात येत आहेत.

**शासन आदेश :-**

नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या आस्थापनेवरील पुढील तक्त्यात दर्शविण्यात आलेल्या नगर रचनाकार (पदवीधारक) (गट-अ/राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांना **सहायक संचालक, नगर रचना (पदवीधारक) (गट-अ/राजपत्रित) (एस-२३ : रु.६७,७००-२,०८,७००)** या पदावर खालील अटींच्या अधीन राहून निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत आहे.

| अ.क्र. | ज्येष्ठता क्रमांक (२०२२ प्रारुप ज्ये.सू.) | अधिकाऱ्याचे नांव | जात प्रवर्ग |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | २८ | श्री.सुनिल जयवंतराव देशपांडे | खुला |
| २ | ३५ | श्री.संजय अरुणराव देशपांडे | खुला |
| ३ | ४४ | श्रीमती दिपाली महादेव सरोदे (श्रीमती दिपाली माणिक बसाखेत्रे) | अ.जा. |
| ४ | ४६ | श्रीमती दिपाली सागर पाटील (श्रीमती दिपाली मधुकर पाटील) | इ.मा.व. |
| ५ | ४८ | श्रीमती रेश्मा प्रसाद देशकर | इ.मा.व. |
| ६ | ४९ | श्रीमती पुजा अजित हिप्परगेकर (श्रीमती पुजा अशोक संखे) | भ.ज.(ड) |

**अटी व शर्ती :-**

I. निवडसूची तयार करताना कोणीही ज्येष्ठ अधिकारी अनावधानाने वगळण्यात आलेले नाहीत अथवा अधिक्रमित झालेले नाही.

II. मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अधिन राहून पदोन्नतीच्या कोटयातील सर्व रिक्त पदे दि.२५.०५.२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात भरण्याबाबत सामान्य प्रशासन विभाग/१६-ब कार्यासनाच्या दि.०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयानुसार दिलेल्या सूचनांनुसार शासन निर्णयाप्रकरणी मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे आव्हान देण्यात आलेले असून त्यावरील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून सदर पदोन्नती देण्यात येत आहे.

III. दिव्यांग कर्मचाऱ्यांना गट-अ व गट-ब मधील पदांवर पदोन्नतीबाबत मा.उच्च न्यायालय, मुंबई यांच्या दि.२२.०७.२०२१ रोजीच्या निर्णयानुसार दिव्यांग आरक्षणासह पदोन्नतीसाठीची सर्व रिक्त पदे सा.प्र.वि./१६-अ यांनी दि.०५.०७.२०२१ रोजीचा शासन निर्णय व दि.२३.०७.२०२१ च्या शासन पत्रान्वये दिलेल्या सूचनांनुसार सदर पदोन्नती देण्यात येत आहे.

IV. सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी निवडसूचीतील अधिकाऱ्यांना नियमितपणाचा कोणताही हक्क मिळणार नाही.

V. या आदेशान्वये पदोन्नती देण्यात येत असलेल्या अधिकाऱ्यांविरुद्ध सद्य:स्थितीत कोणतीही विभागीय चौकशी / न्यायालयीन कारवाई प्रलंबित अथवा प्रस्तावित नाही, या अटीच्या अधिनतेने सदर पदोन्नती देण्यात येत आहे.

VI. ज्येष्ठतासूचीनुसार विचारक्षेत्रातील अधिकाऱ्यांची पात्रापात्रता तपासण्यात आली असून या संदर्भात भविष्यात कोणतेही प्रकरण उद्भवल्यास, सामान्य प्रशासन विभागाच्या सहमतीने यथायोग्य निर्णय घेण्यात येईल.

VII. जात पडताळणी कार्यालय यांच्याकडून प्राप्त जात पडताळणी प्रमाणपत्रासंबंधी भविष्यात कोणत्याही स्तरावर तफावत आढळून आल्यास संबंधित मागासवर्गीय अधिकाऱ्याची पदोन्नती रद्द करुन आवश्यक ती कार्यवाही करण्यात येईल.

VIII. पदोन्नती देण्यात येत असलेले अधिकारी सामान्य प्रशासन विभाग, दि.२५.०५.२००४ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार आरक्षणाचा लाभ मिळवून सेवाज्येष्ठता यादीत वरच्या स्थानावर आल्याचे दिसून येत नाही. तथापि, सदर मागासवर्गीय अधिकाऱ्यांबाबत भविष्यात कोणतेही न्यायालयीन प्रकरण उद्भवल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संचालनालयाची राहील.

IX. सामान्य प्रशासन विभागाच्या दि.०२.०६.२०१४ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार संबंधीत अधिकाऱ्यांनी पदोन्नतीपूर्वी मत्ता व दायित्व विवरणपत्र सादर करणे बंधनकारक राहील.

X. पदोन्नत अधिकारी यांनी सामान्य प्रशासन विभाग, दि.०१.०८.२०१९ च्या शासन निर्णयातील विहित केलेल्या पदोन्नतीच्या निकषाची पूर्तता केली आहे, या अटींच्या अधिन राहून सदर पदोन्नती देण्यात येत आहे.

XI. सदर निवडसूचीतील सेवाज्येष्ठतेनुसार पात्र असलेल्या, तथापि पदोन्नती नाकारलेल्या, अधिकाऱ्यांच्या पदोन्नती संदर्भात सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१२.०९.२०१६ च्या शासन निर्णयानुसार कार्यवाही करण्यात येईल.

XII. विभागाने निवडसूचीतील अधिकाऱ्यांची पदोन्नतीने नियुक्ती करताना महसूली विभाग वाटपासंदर्भात सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१४.०७.२०२१ च्या अधिसूचनेतील तरतुदीनुसार महसूली विभाग वाटपाची कार्यवाही करण्यात आली आहे.

XIII. निवडसूचीस मान्यता देतेवेळी सामान्य प्रशासन विभागाने घातलेल्या अटींच्या अधिनतेने सदर पदोन्नती देण्यात येत आहे.

**०२.** महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसूली विभाग वाटप नियम, २०२१, दि.१४ जुलै, २०२१ मधील तरतुदी व पदोन्नतीने पदस्थापनेकरिता महसुली विभाग वाटपाकरिता दिलेले पसंतीक्रम विचारात घेऊन, पुढील तक्त्यात दर्शविण्यात आल्यानुसार सहायक संचालक, नगर रचना (पदवीधारक) (गट-अ / राजपत्रित) पदावर तात्पुरत्या पदोन्नतीने पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव | पदोन्नतीने पदस्थापना केलेले कार्यालय |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | श्री.संजय अरुणराव देशपांडे | सहायक संचालक, नगर रचना, मुल्यांकन, नागपूर. |
| २ | श्रीमती दिपाली महादेव सरोदे (श्रीमती दिपाली माणिक बसाखेत्रे) | सह संचालक, नगर रचना, नागपूर विभाग, नागपूर या कार्यालयातील सहायक संचालक, नगर रचना या पदावर. |
| ३ | श्रीमती दिपाली सागर पाटील (श्रीमती दिपाली मधुकर पाटील) | सह संचालक, नगर रचना, नाशिक विभाग, नाशिक या कार्यालयातील सहायक संचालक, नगर रचना या पदावर. |
| ४ | श्रीमती रेश्मा प्रसाद देशकर | सह संचालक, नगर रचना, संगणीकृत नियोजन कक्ष (डिजिटल प्लानिंग सेल), पुणे या कार्यालयातील सहायक संचालक, नगर रचना पदावर. |
| ५ | श्रीमती पुजा अजित हिप्परगेकर (श्रीमती पुजा अशोक संखे) | सह संचालक, नगर रचना, कोकण विभाग, नवी मुंबई या कार्यालयातील सहायक संचालक, नगर रचना पदावर. |

**०३.** या आदेशान्वये पदोन्नती देण्यात आलेल्या अधिकाऱ्यांपैकी श्री.सुनिल जयवंतराव देशपांडे यांचे पदस्थापनेचे आदेश यथावकाश निर्गमित करण्यात येतील. उर्वरित अधिकाऱ्यांनी पदोन्नतीने नियुक्तीच्या ठिकाणी विहित कालावधीत रुजू व्हावे. उक्त प्रमाणे रुजू अहवालाबाबत शासनास तातडीने अवगत करण्यात यावे. या आदेशान्वये पदोन्नत झालेल्या अधिकाऱ्यांचा पदस्थापना केलेल्या पदावर रुजू झाल्याचा अहवाल संबंधित कार्यालय / संचालक, नगर रचना, पुणे यांनी nitin.shelke@nic.in या ई-मेल पत्त्यावर तात्काळ सादर करावा.

**०४.** पदोन्नत अधिकारी हे पदोन्नतीने नियुक्तीच्या ठिकाणी विहित मुदतीत हजर न झाल्यास किंवा पदोन्नती न स्वीकारल्यास, त्यांना पदोन्नती नको आहे, असे समजून अशा अधिकाऱ्यास कालबद्ध पदोन्नती / सेवातंर्गत आश्वासित प्रगती योजना / सुधारित सेवातंर्गत आश्वासित प्रगती योजनेचा लाभ मंजूर करण्यात आला असल्यास, वित्त विभाग, शासन शुद्धीपत्रक क्र.आप्रयो-१०१५/प्र.क्र.१११/२०१५/सेवा-३, दि.२३ डिसेंबर, २०१५ मधील तरतुदीनुसार सदरचा लाभ काढून घेण्यात येईल. मात्र दिलेल्या लाभाची वसुली करण्यात येणार नाही.

**०५.** या आदेशान्वये पदोन्नती देण्यात येणाऱ्या अधिकाऱ्यांनी पदोन्नती नाकारल्यास सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.१२.०९.२०१६ मधील तरतुदीनुसार त्यांचे नांव निवडसूचीतून काढून टाकण्यात येईल. तसेच यानंतर पुढील दोन वर्षी होणाऱ्या निवडसूच्यांमध्ये संबंधित अधिकाऱ्यांची पदोन्नतीसाठीची पात्रता तपासण्यात येणार नाही. तद्नंतर गुणवत्तेप्रमाणे संबंधित अधिकारी पदोन्नतीसाठी पात्र ठरल्यास त्याचा नियमित निवडसूचीत समावेश करण्याबाबत त्यांच्या नांवाचा विचार करण्यात येईल.

०६. या आदेशान्वये पदोन्नती देण्यात येत असलेल्या अधिकाऱ्यांनी पदग्रहण केल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत वेतननिश्चितीचा विकल्प द्यावा. असा विकल्प न दिल्यास प्रचलित नियम विचारात घेवून त्यांची वेतननिश्चिती करण्यात यावी.

०७. या आदेशान्वये पदोन्नती देण्यात येत असलेल्या अधिकाऱ्यांनी पदोन्नतीने नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास किंवा राजकीय दबाव आणून नियुक्ती अन्य ठिकाणी करण्याचा प्रयत्न केल्यास, संबंधित अधिकाऱ्यांच्या गोपनीय अहवालात त्यानुसार नोंद घेण्यात येईल. तसेच राजकीय दबावाची कृती ही महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम ३ (३) व २३ चा भंग करणारी असल्याने संबंधित अधिकाऱ्याविरुद्ध शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, यांची नोंद घेण्यात यावी.

०८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०५३११३१५४४६८२५ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

VIJAY KARBHARI CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=E1FEEA176A1E6A273C574BB6F1A1EDB58BF87424118BCCD6EE07340581733B70, cn=VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2023.05.31 14:54:42 +05'30'

**( विजय चौधरी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति :-**

**संबंधित अधिकारी** यांना (व्दारा : संचालक, नगर रचना, पुणे.)

**प्रत :-**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव.
२. मा.मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उपमुख्यमंत्री महोदयांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७. मा.उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
८. मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
९. सर्व सन्माननीय विधानपरिषद/विधानसभा सदस्य.
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
१२. मा.अपर मुख्य सचिव (सेवा) यांचे स्वीय सहायक, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. मा.अपर मुख्य सचिव (नवि-१) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. मा.प्रधान सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. आयुक्त, लातूर महानगरपालिका, लातूर.
१६. आयुक्त, ठाणे महानगरपालिका, ठाणे.
१७. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई/नागपूर.
१८. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-४११ ००१.
१९. सह संचालक, नगर रचना, पुणे विभाग, पुणे.

२०. सह संचालक, नगर रचना, कोकण विभाग, नवी मुंबई.
२१. सह संचालक, नगर रचना, नाशिक विभाग, नाशिक.
२२. सह संचालक, नगर रचना, नागपूर विभाग, नागपूर.
२३. सह संचालक, नगर रचना, संगणीकृत नियोजन कक्ष (डिजिटल प्लानिंग सेल), पुणे.
२४. उप सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२५. सहायक संचालक, नगर रचना, मुल्यांकन, नागपूर.
२६. सहायक संचालक, नगर रचना, नाशिक शाखा, नाशिक.
२७. सहायक संचालक, नगर रचना, पालघर शाखा, पालघर.
२८. मुख्याधिकारी, अचलपूर नगरपरिषद, अचलपूर.
२९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
३०. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, नागपूर.
३१. सर्व संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
३२. निवडनस्ती / नवि-२७.

*****